**सार्वजनिक गणेशोत्सव स्पर्धा-२०२४ आयोजनासाठी व स्पर्धेतील विजेत्या सार्वजनिक गणेशोत्सव मंडळांच्या पारितोषिक वितरण समारंभासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- पुलदे-२०२४ /प्र.क्र.१११/सां.का. २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : २१ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-** १. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक-पुलदे २०२४/प्र.क्र.१११/सां.का.२, दि.३१.०७.२०२४

२. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांची अनुक्रमे पत्र क्र. पुलदे/५९०, दि.०३.०७.२०२४ व पुलदे/७०९, दि.१२.०८.२०२४

**प्रस्तावना :-**

सन २०२४ च्या, दिनांक ०७ ते १७ सप्टेंबर, २०२४ या कालावधीतील सार्वजनिक गणेशोत्सवात जास्तीत जास्त सार्वजनिक गणेशोत्सव मंडळांनी सहभागी व्हावे, याकरीता सर्वोत्कृष्ट सार्वजनिक गणेशोत्सव मंडळास राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय पुरस्कार देण्याचा निर्णय, शासनाने उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. तसेच, सदर स्पर्धेत सहभागी होणाऱ्या सार्वजनिक गणेशोत्सव मंडळांसाठीचे निकष व पारितोषिक पध्दती व इतर बाबी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात नमूद करण्यात आल्या आहेत. सार्वजनिक गणेशोत्सव स्पर्धा-२०२४ अंतर्गत, राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय पुरस्कार प्राप्त सार्वजनिक गणेश मंडळांना पारितोषिक वितरणाचा कार्यक्रम आयोजित करण्यात येणार आहे. सदर कार्यक्रमाच्या पूर्वतयारी व आयोजनासाठी अंदाजित रु.५३,३७,०००/- इतका खर्च होणार असून सदरचा खर्च करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची विनंती, संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी संदर्भ क्र.२ च्या पत्रांन्वये केली आहे. त्यानुसार सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक गणेशोत्सव स्पर्धा-२०२४ अंतर्गत, राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय पुरस्कार प्राप्त सर्वोत्कृष्ट सार्वजनिक गणेश मंडळांना पारितोषिक वितरित करण्याच्या कार्यक्रमाच्या पूर्वतयारी व आयोजनासाठी होणाऱ्या रु.५३,३७,०००/- (अक्षरी रुपये त्रेपन्न लक्ष सदतीस हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्य सार्वजनिक गणेशोत्सव स्पर्धा-२०२४ खर्चाचे अंदाजपत्रक खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | बाबनिहाय तपशील | अंदाजित खर्च (रु. हजारात) |
|---|---|---|
| १ | पारितोषिकाची रोख रक्कम | रु.१८,७५,०००/- |
| २ | पारितोषिक वितरण सोहळ्याच्या वेळी नाट्यगृहाच्या सजावटीवरील खर्च) | रु.२,२०,०००/- |
| ३ | नाट्यगृहातील प्रकाश, ध्वनी, लाईव्ह स्ट्रिमिंग (एडिटिंग, एल.इ.डी. स्क्रीन (०२) यावरील खर्च. | रु.२,२०,०००/- |
| ४ | रंगमंच नेपथ्य, फ्लेक्स मांडणी, रंगमंचीय व्यवस्थापन, सनई चौघडे यावरील खर्च | रु.१,१०,०००/- |
| ५ | सांस्कृतिक कार्यक्रम यावरील खर्च | रु.१,५०,०००/- |
| ६ | समन्वयक मानधन व अन्य यंत्रणा यावरील खर्च | रु.१,५०,०००/- |

| | | |
|---|---|---|
| ७ | पारितोषिक विजेत्या सार्वजनिक गणेशोत्सव मंडळांना भोजन व अल्पोपहार | रु.२,००,०००/- |
| ८ | जाहिरातीवरील खर्च | रु.१८,५०,०००/- |
| ९ | नाट्यगृहाचे भाडेदर | रु.१,०७,०००/- |
| १० | पारितोषिक विजेत्या सार्वजनिक गणेशोत्सव मंडळांच्या प्रतिनिधींच्या निवासावरील खर्च | रु.१,५०,०००/- |
| ११ | स्वयंसेवक मानधन | रु.५०,०००/- |
| १२ | आकस्मिक खर्च | रु.४५,०००/- |
| १३ | छपाई व डिझाईन वर्क यावरील खर्च | रु.९०,०००/- |
| १४ | प्रमाणपत्र, स्मृतिचिन्हे आणि भेटवस्तू यावरील खर्च | रु.१,२०,०००/- |
| | **एकूण रक्कम** | **रु.५३,३७,०००/-** |

**(टीप-** उपरोक्त तक्यातील बाबनिहाय खर्चामध्ये १५% पर्यंत (रु.५३.३७ लक्ष मर्यादेत) फेरफार करण्याचे अधिकार संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना राहतील.)

०२. सदरचा खर्च मागणी क्रमांक “झेडडी-०२, मुख्य लेखाशिर्ष २२०५ कला व संस्कृती (१०१) ललित कला शिक्षण (०७) कला अकादमी (०७) (०१) पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी (२२०५१४६३)- ५० इतर खर्च (अनिवार्य)” या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. सदर कार्यक्रमासाठी होणाऱ्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी शासनास एका महिन्याच्या आत सादर करावे.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र. वि.अ.प/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग दोन, दि. १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-एक, उप विभाग-तीन अ.क्र.४, परिच्छेद क्र. २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०८२१११३८३२२२२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राने राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec0366 6d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19 E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.08.21 12:50:02 +05'30'

( नंदा मा. राऊत )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति:-**

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री तथा गृहमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री तथा वित्तमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

७. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य),पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. महालेखापाल लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता महाराष्ट्र-१, मुंबई.
११. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. अवर सचिव/कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती, सां.का.२.